नाबार्ड अर्थसहाय्यित ग्रामीण सांडपाणी व्यवस्थापन योजनांसाठी दरडोई खर्च मर्यादा निश्चित करणे.

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन निर्णय क्रमांकः नाबार्ड-२०१४/प्र.क्र.०४/पापु.०८
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.**
तारीख: **५ ऑगस्ट, २०१४**

**वाचा**

१) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधीकरण, मुंबई यांचे पत्र क्र.मजीप्रा/सस/तांशा-३/१३५, दि.११.०२.२०१४.

२) नाबार्ड, पुणे यांचे इंग्रजी पत्र NB/SPD/३०२७१/१०५/RIDF-XIX/Maharashtra/१४१ PSC/२०१३-१४, dated ०४.०३.२०१४

३) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांचे पत्र क्र.मजीप्रा/तांशा-३/३४९, दि.०९.०४.२०१४.

**प्रस्तावना**

सन २००१ च्या जनगणनेनुसार राज्यातील १५००० व त्यापेक्षा जास्त लोकसंख्या असणाऱ्या ९४ गावांमध्ये विषयांकित प्रकल्प राबविणे निश्चित झाले होते. त्यानुसार शासनाने दि.२९/३/२०१२ च्या शासन निर्णयाव्दारे रु.१००.१२ कोटी किंमतीच्या प्रकल्पास तत्वत: प्रशासकीय मान्यता प्रदान केलेली होती व नाबार्डने RIDF-XVII अंतर्गत या कार्यक्रमास अर्थसहाय्य मंजूर केले होते. मूळ मंजुर प्रकल्पानुसार गावात निर्माण होणाऱ्या सांडपाण्यावर प्रक्रिया करण्यासाठी Soil Bio Technology आणि Phytorid Technology या अनुक्रमे IIT, मुंबई व NEERI, नागपूर यांनी विकसित केलेल्या तंत्रज्ञानावर आधारीत प्रक्रिया केंद्राची (End Treatment) उभारणी करणे, एवढीच बाब या प्रकल्पात अंतर्भूत होती.

२. तथापि, सांडपाण्यामुळे होणारे जलस्त्रोतांचे प्रदुषण कमी करणे व सार्वजनिक आरोग्य उंचावणे या मुख्य उद्देशाची पूर्तता करण्यासाठी **सांडपाण्याचे संकलन, प्रक्रिया केंद्रापर्यंत संवहन** व **सांडपाणी प्रक्रिया** या तिन्ही भागांचा अंतर्भाव या योजनेमध्ये करणे आवश्यक असल्याचे स्पष्टपणे निदर्शनास आल्याने नाबार्ड व्यवस्थापनाशी चर्चा करुन **सांडपाणी संकलन, संवहन व सांडपाणी प्रक्रिया** या तिन्ही भागांचा अंतर्भाव करुन प्रत्येक गावाचा सविस्तर प्रकल्प अहवाल शासनास सादर करण्याची कार्यवाही करावी असा निर्णय झाला. यास अनुसरुन २८ गावांच्या सांडपाणी व्यवस्थापन योजनांचे तपशिलवार प्रकल्प अहवाल **नाबार्ड अर्थसहाय्यीत RIDF-XIX** मालिकेत कर्जसहाय्यार्थ समाविष्ट करण्यासाठी नाबार्डकडे प्रस्तावित करण्यात आले. उपरोक्त RIDF-XVII अंतर्गत असलेली नाबार्डची कर्जमान्यता

अधिक्रमित करून आता नाबार्डने RIDF-XIX मालिकेंतर्गत २८ गावांच्या एकूण रु.११२.५८ कोटी खर्चाच्या प्रस्तावासाठी रु.९७.३५ कोटी एवढे कर्जसहाय्य देण्यासंदर्भात पत्र क्र.२ नुसार नाबार्डने मान्यता प्रदान केली आहे. प्रकल्पातील समाविष्ट गावांच्या सांडपाणी व्यवस्थापन योजनांना स्वतंत्रपणे प्रशासकीय मान्यता देण्याची कार्यवाही यथावकाश पूर्ण करण्यात येईल.

३. ग्रामीण भागातील या सांडपाणी व्यवस्थापन योजनेच्या दरडोई खर्चाचे निकष निश्चित करण्यासाठी प्रस्ताव सादर करण्याच्या सूचना शासनाच्या पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाकडून पत्र क्र.संस्वअ-२०११/प्र.क्र.२२८/पापु-१६ दि.६/६/२०१३ अन्वये महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांना देण्यात आल्या होत्या. त्यानुसार महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांनी सर्व उपलब्ध माहितीचा अभ्यास करुन दरडोई खर्चाच्या निकषाचा प्रस्ताव प्रथमत: दि.४/९/२०१३ चे पत्रान्वये शासनास मंजुरीस्तव सादर करण्यात आला होता. सदर प्रस्ताव त्यावेळी पुर्णत्वाच्या टप्यावर असलेल्या एकूण २२ गावांच्या सविस्तर प्रकल्प अहवालांवर आधारीत होता.

४. या प्रकल्पाचे नियोजन व अंमलबजावणी करत असताना उद्भवणाऱ्या अडचणी, सुधारणा यानुसार दरडोई खर्चाचा अभ्यास करुन निकषामध्ये सुधारणा करणे आवश्यक असल्याचे उपरोक्त प्रस्तावात नमुद केले होते. तद्नंतर Phytorid व Soil Bio Technology या दोन्ही तंत्रज्ञानावर आधारित सांडपाणी प्रक्रिया केंद्राची उभारणी करणे यावर आधारित एकूण ३० गावांच्या सविस्तर प्रकल्प अहवालांना महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या सक्षम अधिकाऱ्यांनी तांत्रिक मान्यता प्रदान केली आहे. वरील परिच्छेद १.२ मध्ये नमुद केल्याप्रमाणे **आता ग्रामीण सांडपाणी व्यवस्थापन प्रकल्प टप्पा -१ हा २८ गावांमध्ये नाबार्डच्या RIDF-XIX** मालिके अंतर्गत राबवायचा आहे. नाबार्डने संदर्भाधिन क्र.२ येथील पत्रानुसार दिलेल्या मान्यतेस अनुसरुन दि.०६.०३.२०१४ च्या पत्रान्वये दरडोई खर्च निकषाचे प्रस्ताव सादर करण्याबाबत महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांना निर्देशित करण्यात आले होते. त्यामुळे तांत्रिक मान्यता प्रदान केलेल्या ३० गावांच्या सविस्तर अहवालातील अंदाजपत्रकावर आधारित माहितीनुसार दरडोई खर्चाच्या निकषाचा अभ्यासात्मक आढावा घेण्यात आला. **आता सदर ३० गावांची सविस्तर माहिती उपलब्ध असल्याने या माहितीवर दरडोई खर्चाचे निकष ठरविणे अधिक संयुक्तीक व वस्तुनिष्ठ असल्याने या ३० गावांचा तुलनात्मक आढावा घेऊन दरडोई खर्च निकषाचा प्रस्ताव संदर्भाधिन क्र.** ३ येथील दि. ०९/०४/ २०१४ च्या **पत्रान्वये** शासनास **प्राप्त झाला आहे.** त्यानुसार, नाबार्ड अर्थसहाय्यीत ग्रामीण सांडपाणी व्यवस्थापन योजनांसाठी दरडोई खर्चाच्या निकषासंदर्भात मान्यता प्रदान करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

## शासन निर्णय

प्रस्तावनेत नमूद केलेल्या तपशिलाच्या अनुषंगाने नाबार्ड अर्थसहाय्यीत ग्रामिण सांडपाणी व्यवस्थापन प्रकल्पातील योजनांसाठी दरडोई खर्च निकषांना शासनाची मान्यता देण्यात येत असून सदर दरडोई खर्चाचे निकष पुढील प्रमाणे आहेत.

| क्षेत्र वर्गवारी | दरडोई खर्च मर्यादा |
|---|---|
| सर्वसाधारण | रु.१९५०/- |
| आदिवासी / डोंगरी / मुंबई महानगर प्रदेश क्षेत्र | रु.२१४५/- |
| ऊस उत्पादन क्षेत्र | रु.२०४५/- |

१) दरडोई खर्चाच्या उपरोक्त निकषात बसणा-या ग्रामिण सांडपाणी व्यवस्थापन प्रकल्पातील योजनांना संबंधित सक्षम प्राधिका-यांनी मान्यता द्यावी.
२) जास्तीत जास्त योजना विभागाच्या स्तरावर निकाली काढाव्यात यासाठी उपरोक्त विहीत निकषाच्या १०० % पर्यंत जास्त दरडोई खर्च असलेल्या योजनांना पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाकडून शासन स्तरावरुन मान्यता देण्यात येईल.
३) उपरोक्त विहीत निकषाच्या १०० % पेक्षा अधिक दरडोई खर्च असणाऱ्या योजनांच्या प्रस्तावांना प्रधान सचिव (वित्त), प्रधान सचिव (नियोजन) आणि प्रधान सचिव (पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग) यांचा समावेश असलेल्या उच्चाधिकार समितीमार्फत मान्यता देण्यात येईल.
४) वरील दरडोई खर्चाचे निकष हे संकल्पित वर्षातील लोकसंख्येवर आधारीत आहेत.
५) या प्रकल्पात रासायनिक सांडपाण्यावरील प्रक्रियेचा अंतर्भाव नाही.
६) दरडोई खर्चाचे निकष Soil Bio आणि Phytorid या दोन तंत्रज्ञानावर आधारित आहेत.
७) सदर दरडोई खर्चाचे निकष हे केवळ मान्यताप्राप्त ११० गावांच्या नाबार्ड अर्थसहाय्यीत ग्रामिण सांडपाणी व्यवस्थापन प्रकल्पातील योजनांसाठीच मर्यादित राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८०२१३३७०५४६२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kiran Gitte
Digitally signed by Kiran Gitte
DN: CN = Kiran Gitte, C = IN, S = Maharashtra, O = ALL INDIA SERVICE, OU = IAS
Date: 2014.08.07 19:04:27 +05'30'

( किरण गित्ते )
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रत,

१. मा.राज्यपाल यांचे सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे सचिव

३. मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव
४. मा.मंत्री,पाणी पुरवठा व स्वच्छता मंत्रालय,मुंबई यांचे खाजगी सचिव
५. मा.राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता मंत्रालय,मुंबई यांचे खाजगी सचिव
६. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
७. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता मंत्रालय,मुंबई
८. सचिव, ग्रामविकास मंत्रालय, मुंबई
९. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई
१०.विभागीय आयुक्त, (सर्व)
११. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय मंत्रालय, मुंबई
१२. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, (सर्व)
१३. संचालक लेखा व कोषागारे, मुंबई
१४. संचालक, वासो, बेलापूर, नवी मुंबई
१५. प्रबंधक, नाबार्ड, पुणे
१६. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१७. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
१८. पा.पु. व स्व.विभागातील सर्व पर्यवेक्षीय अधिकारी व सर्व कार्यासने, मंत्रालय, मुंबई.
१९. निवड नस्ती, पापु. ०८.